**कॉर्नेल युनिर्व्हसिटी न्यु यॉर्क (यु.एस.ए) यांच्या सहकार्याने राज्यामध्ये बिझनेस ॲक्सलरेटर/ इनक्युबेशन सेंटर स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. एमओयु-२०१९ / प्र.क्र.७६/ उद्योग-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक ०६/०३/२०२०

**वाचा:-** १) विकास आयुक्त(उद्योग) यांनी दि.०५/०४/२०१९ रोजी सादर केलेला प्रस्ताव.
२) उद्योग सह संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांचे दि.१६/०९/२०१९ चे पत्र.
३) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एमओयु-२०१९ / प्र.क्र.१५२/ उद्योग-२, दि.१८/०९/२०१९.

**प्रस्तावना:-**

राज्याचे नवीन औद्योगिक धोरण दिनांक ०७/०३/२०१९ च्या आदेशान्वये घोषीत करण्यात आले आहे. सदर औद्योगिक धोरणामधे नावीन्यपूर्ण स्टार्टअप्सना आवश्यक पायाभूत सुविधा प्रदान करुन नवउद्योजकांना पूरक वातावरण निर्माण करण्यासाठी धोरणाचा भाग म्हणून राज्य शासन पाठबळ देईल. नवउद्योजकांना आर्थिक सहाय्य, समुपदेशन देऊन मदत केली जाईल व त्यांच्या कल्पनांचे आदानप्रदान करण्यासाठी पुरेश्या उपाययोजना केल्या जातील. राज्य सर्वसाधारणपणे खुल्या प्रवर्गातील आणि अनुसूचित जाती/ अनुसूचित जमाती प्रवर्गातील व महिला उद्योजकांसाठी स्टार्टअप्ससाठी इनक्यूबेटर्सची स्थापना करण्यात येईल व त्यांना आवश्यक आर्थिक आणि प्रशासकीय सहाय्य देऊन प्रोत्साहीत केले जाईल. यास्तव जागतिक दर्जाच्या विद्यापीठांच्या सहकार्याने इनक्यूबेटर्सची स्थापना करण्यात येईल व त्यांना आवश्यक आर्थिक आणि प्रशासकीय सहाय्य देऊन प्रोत्साहित केले जाईल असे स्प्ष्ट केले आहे.

राज्याच्या औद्योगिक धोरणातील उपरोक्त नमूद उद्दीष्टांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने राज्यात Business Accelerator/ Incubation Centre स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे राज्यात Business Accelerator/ Incubation Centre स्थापन करण्यासंबंधीचा कॉर्नेल युनिर्व्हसिटी, न्यू यॉर्क (यु.एस.ए.) यांच्या समवेत करावयाच्या Master Service Agreement व XED (Asia partner of Cornell) यांच्या समवेत Services Agreement अशा दोन सामंजस्य कराराच्या मसुद्याची विधी व न्याय विभागाकडून कायदेशीर व वैधानिक तपासणी करुन घेण्यात आली आहे. तसेच प्रस्तुत सामंजस्य करारास मा.मुख्यमंत्री महोदयांची तत्वत: मान्यता प्राप्त झाली आहे. याअनुषंगाने संबंधित संस्थासोबत करावयाच्या दोन सामंजस्य करारामुळे शासनावर प्रती वर्ष पडणा-या रुपये ७ कोटी एवढ्या आर्थिक

भारासंबंधी दि.१८/०९/२०१९ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. तथापि, सदर शासन निर्णयामध्ये योजनेचे स्वरुप व आर्थिक भार याअनुषंगाने सुस्पष्ट निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तुत प्रकरणी यापूर्वी दि.१८/०९/२०१९ रोजी निर्गमित केलेला शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. राज्याचे नवीन औद्योगिक धोरण दिनांक ०७/०३/२०१९ च्या आदेशान्वये घोषीत करण्यात आले असून सदर शासन निर्णयामध्ये नमूद राज्यात Business Accelerator/ Incubation Centre स्थापन करण्याबाबतच्या धोरणाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने कॉर्नेल युनिर्व्हसिटी, न्यू यॉर्क ( यु.एस.ए.) समवेत Master Service Agreement व XED (Asia partner of Cornell) समवेत Services Agreement असे दोन सामंजस्य करार करण्यास या निर्णयाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त नमूद संस्थासोबत सदरचा सामंजस्य करार (MoU) झाल्यानंतर तो प्रायोगिक तत्त्वावर प्रथम ३ (तीन) शैक्षणिक वर्षासाठी अंमलात राहील. तथापि, परिस्थितीनुसार सदर कालावधीमध्ये बदल करण्याचा अधिकार विकास आयुक्त (उद्योग) यांना राहील. त्यास आवश्यकतेनुसार शासनाची मान्यता घेण्यात यावी.

३. सामंजस्य करारात नमूद अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करणे कॉर्नेल युनिर्व्हसिटी, न्यू यॉर्क (यु.एस.ए.) तसेच XED (Asia partner of Cornell) या संस्थांना बंधनकारक राहील. तसेच सामंजस्य करारातील अटी व शर्तीचे पालन होत आहे किंवा नाही यांचे संनियंत्रण व देखरेखीची जबाबदारी ही विकास आयुक्त (उद्योग) यांची राहील.

४. या सामंजस्य करारापोटी प्रती वर्ष रुपये ७ कोटी एवढा खर्च होणार आहे. त्यापैकी प्रती वर्ष रुपये ५ कोटी प्रमाणे तीन वर्षाकरीताचा खर्च हा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्याकडून करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच उर्वरीत रुपये २ कोटीपैकी रुपये १ कोटी एवढा खर्च आदिवासी विकास विभाग व रुपये १ कोटी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून भारतरत्न बाबासाहेब आंबेडकर (अनुसूचित जाती/ अनुसूचित जमाती) उद्योजकांसाठी विशेष प्रोत्साहन योजना (२८५२ A००४) या प्रचलित योजनेअंतर्गत प्राप्त होणा-या निधीमधून भागविण्यात यावा.

५. प्रस्तुत योजनेअंतर्गत दरवर्षी ६० नवउद्योजकांना प्रशिक्षीत करण्यात येणार आहे. सदर प्रशिक्षणाची प्रवेश व निवड प्रक्रीया पारदर्शक पध्दतीने विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन पार पाडण्याची व तद्अनुषंगिक इतर बाबीविषयी कार्यवाही करण्याची जबाबदारी ही विकास आयुक्त (उद्योग) यांची राहील.

६. सदर शासन निर्णय हा आदिवासी विकास विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२३०६, दि.१०/१२/२०१९, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१३०,

दि.२३/०१/२०२० तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १९४/२०१९, दि.१४/०२/२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३०६१५२७३९५५१० आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2020.03.06 17:56:17 +05'30'

**( संजय देगांवकर )**

**सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
४. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री, (सामाजिक न्याय/ आदिवासी विकास /कौशल्य विकास/उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय/ आदिवासी विकास /कौशल्य विकास/उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
११. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
१३. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई.
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), नागपूर
१६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
१८. निवडनस्ती (उद्योग-२)